GR-200208031653900१-1201

केंद्र शासनाची 'संपूर्ण ग्रामीण रोजगार योजना' राज्यात लागू करणे व जिल्हा स्तरावर ग्रामीण रोजगार समन्वय तथा प्रभावी अंमलबजावणीबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.संग्रारोयो-२००१/प्र.क्र.२४३ /जल-१६,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ८ फेब्रुवारी, २००२

वाचा:- १) केंद्र शासनाच्या ग्रामीण विकास मंत्रालयाचे सह सचिव (पी.ए.) यांचे क्र.व्ही-२४०११/३४/२००१/एसजीआरवाय, दिनांक १२-१०-२००१ चे अर्ध शासकीय पत्र.

२) केंद्र शासनाच्या ग्रामीण विकास मंत्रालयाचे संचालक (इएएस) यांचे क्र.व्ही २४०११/३४३/२००१/एसजीआरवाय दिनांक १७-१०-२००१ चे अर्ध शासकीय पत्र.

३) शासन पत्र, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.जग्रासयो/२००१/ प्र.क्र.९३४/जल-१५, दिनांक : १८.१०.२००१.

४) अर्ध शासकीय पत्र, ग्राम विकास विभाग, क्र.जलसं १००१/८६३/सीआर-५५३/जल-७, दिनांक : ११.१०.२००१.

५) केंद्र शासनाच्या ग्रामीण विकास मंत्रालयाचे पत्र क्रमांक २४०२५/१३/२००१/ईएएस/एसजीआरवाय/१६, दिनांक १० डिसेंबर, २००१.

६) केंद्र शासनाच्या ग्रामीण विकास मंत्रालयाचे पत्र क्रमांक २४०१५/१५/२००१-जेजीएसवाय/क्र. ९१, दिनांक १३ डिसेंबर, २००१.

७) शासन पत्र ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र संग्रारोयो १००१/प्रक्र २४४/ जल १६, दिनांक २७ डिसेंबर, २००१.

८) केंद्र शासनाच्या ग्रामीण विकास मंत्रालयाचे पत्र क्रमांक व्ही-२४०११/३४/२००१-एसजीआरवाय, दिनांक १ जानेवारी, २००२.

९) शासन पत्र ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. संग्रारोयो ११०१/प्रक्र २८२/ जल १६, दिनांक ९ जानेवारी, २००२.

१०) शासन पत्र ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. संग्रारोयो १००१/प्रक्र २४४/ जल १६, दिनांक १० जानेवारी, २००२.

११) शासन पत्र, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. संग्रारोयो १००१/ प्रक्र २४४/जल १६, दिनांक १५ जानेवारी, २००२.

१२) शासन पत्र,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. संग्रारोयो १००१/प्रक्र २४४/ जल १६, दिनांक १६ जानेवारी, २००२.

१३) शासन पत्र, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक अधापू १००२/प्र.क्र. १८२२/नापु-२२, दिनांक १६ जानेवारी २००२.

१४) अर्धशासकीय पत्र, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक: संग्रारोयो १००१/ प्र.क्र. २४४/जल-१६, दिनांक १६-१-२००२.

**प्रस्तावना** :-

१० व्या पंचवार्षिक योजनेच्या दिशादर्शक मसुद्यामध्ये केंद्र शासनाने दारिद्रय निर्मुलनाचा एक महत्वाचा भाग म्हणून 'संपूर्ण ग्रामीण रोजगार योजना' दर्शविलेली आहे. त्यानुसार दिनांक १५ ऑगस्ट २००१ रोजी राष्ट्राला उद्देशून केलेल्या भाषणात मा. पंतप्रधान महोदयांनी धान्याशी निगडीत अशी नवीन रोजगार योजना (संपूर्ण ग्रामीण रोजगार योजना ) जाहीर केली. त्या अनुषंगाने केंद्र शासनाने आश्वासित रोजगार योजना व जवाहर ग्राम समृध्दी योजना समाविष्ट करुन, संपूर्ण ग्रामीण रोजगार योजना दिनांक २५/९/२००१ पासून देशात लागू केलेली आहे.

२. हा कार्यक्रम 'स्वयं उद्दिष्ट' प्रणालीचा आहे. महाराष्ट्रातील रोजगार हमी योजनेच्या धर्तीवर या कार्यक्रमाची रचना व कार्यपध्दती आखण्यात आलेली आहे. या कार्यक्रमाखाली रोजगाराचा भाग म्हणून मजूरांना अन्नधान्य वाटप करण्यात येणार आहे. थोडक्यात, 'रोजगार व अन्नधान्य' यांच्या माध्यमातून ग्रामीण भागातील दारिद्रय रेषेखालील कुटुंबांना सामाजिक सुरक्षितता देणे व या मनुष्यबळाच्या माध्यमातून ग्रामीण भागात जलसंवर्धन/पाणलोट विकास, रस्ते व छोटी बांधकामे विकसीत करणे, हा या कार्यक्रमाचा प्रमुख उद्देश आहे.

३. या पूर्वीच्या केंद्र शासनाच्या रोजगार कार्यक्रमापेक्षा हा अतिशय वेगळ्या प्रकारचा कार्यक्रम आहे, ही बाब नियोजनामध्ये केंद्रस्थानी ठेवणे अत्यावश्यक आहे. या कार्यक्रमाखाली कोणत्याही प्रकारची कंत्राटी पध्दतीची कामे घेता येणार नाहीत, किंबहुना अशाप्रकारची कामे घेण्यात येऊ नयेत, अशी केंद्र शासनाची स्पष्ट भूमिका आहे. या कार्यक्रमाखाली मजूरांना धान्य वाटप सक्तीचे राहणार आहे. धान्य न वाटल्यास तितकाच निधी त्या राज्याचा/जिल्हयाचा कमी होणार आहे. थोडक्यात, धान्य वाटप हा या कार्यक्रमाचा अनिवार्य भाग राहील. धान्य वाटपासाठी हजेरीपट ठेवणे, धान्य वाटपासाठी मजुरांना कुपने देणे, हे अंमलबजावणी करणा-या यंत्रणेवर सक्तीचे राहील.

४. राज्यामध्ये 'संपूर्ण ग्रामीण रोजगार योजने ' सारखी रोजगार हमी योजना पूर्वीपासून अस्तित्वात आहे. या दोन्ही योजनांची उद्दिष्टये व योजने अंतर्गत कामाचे स्वरुप एकाच प्रकारचे आहे. उदा. जलसंवर्धन/पाणलोट विकासावरील भर व विशेष प्राधान्य. याशिवाय, केंद्र शासनाच्या अवर्षण प्रवण क्षेत्र विकास व एकात्मिक पडिक जमीन विकास या योजनाही राबविण्यात येतात. तसेच, जलसंधारण विभागाचा पाणलोट विकास कार्यक्रमही समांतर पध्दतीने चालू आहे. याशिवाय नाबार्ड व इंडो जर्मन प्रकल्पाचा पाणलोट विकास कार्यक्रमही राज्यामध्ये राबविण्यात येत आहे. थोडक्यात, जलसंवर्धनाचे/पाणलोटाचे वेगवेगळे, एकाच उद्दिष्टाचे कार्यक्रम व पाणलोट विकासाच्या निरनिराळया संस्थांचे कार्यक्रम यांचा योग्य समन्वय करणे व प्रभावी अंमलबजावणी करणे, हे जिल्हा प्रशासनाला फार मोठे आव्हान आहे. याबाबत शासन स्तरावर जलसंधारण विभागाच्या सर्व योजनांसंबंधी अतिशय सखोल आढावा घेण्यात आला व असा निर्णय घेण्यात आला की, जिल्हा स्तरावर जिल्हाधिकारी, अध्यक्ष, जिल्हा परिषद, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, उप जिल्हाधिकारी (रोजगार हमी योजना) व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांच्या समितीने जिल्हा रोजगाराचा वार्षिक आराखडा तयार करावा. या आराखडयात रोजगार हमी योजना, संपूर्ण ग्रामीण रोजगार योजना, आश्वासित रोजगार योजना व पाणलोट विकासाच्या योजना यांचा अंतर्भाव करावा. जलसंधारणाला/पाणलोट विकासाला वरील सर्व योजनांमधून ५० टक्के निधी राखून ठेवला जावा, असा निर्णय घेण्यात आलेला आहे. (अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम व एकात्मिक पडिक जमीन विकास कार्यक्रमा मधील सर्व निधी). वरील सर्व बाबींचा विचार करता, राज्यात केंद्र शासनाची संपूर्ण ग्रामीण रोजगार योजना कार्यान्वित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय -**

केंद्र शासनाची संपूर्ण ग्रामीण रोजगार योजना राज्यात कार्यान्वित करण्याबाबत राज्य शासनाने ठरविले आहे. केंद्र शासनाच्या ग्रामीण विकास मंत्रालयाची संदर्भिय अ.शा. पत्रे, दिनांक १२/१०/२००१ व दि. १७/१०/२००१ तसेच त्यासोबतच्या मुख्य सूचना, यानुसार सन २००१-२००२ या चालू वर्षी सध्या सुरु असलेल्या केंद्र पुरस्कृत आश्वासित रोजगार योजना व जवाहर ग्राम समृध्दी योजना या योजना नवीन संपूर्ण ग्रामीण रोजगार योजनेमध्ये समाविष्ट करण्यात येवून, संपूर्ण ग्रामीण रोजगार योजनेचा एक भाग म्हणून सुरु राहणार आहेत. सन २००२-२००३ या पुढील आर्थिक वर्षीपासून पूर्ण एकात्मिक स्वरुपाची संपूर्ण ग्रामीण रोजगार योजना अंमलात आणण्यात येणार आहे.

२. सन २००१-२००२ या चालू वर्षासाठी केंद्र शासनाने विहित केलेल्या अंमलात आणावयाच्या मुख्य सूचना (केंद्र शासनाने सुधारीत केलेल्या ) सोबतच्या परिशिष्ट -१ मध्ये दिलेल्या आहेत. तसेच २००१-२००२ या चालू वर्षासाठी संपूर्ण ग्रामीण रोजगार योजना (आश्वासित रोजगार योजना) व संपूर्ण ग्रामीण रोजगार योजना (जवाहर ग्राम समृध्दी योजना) करिता केंद्र शासनाने कळविलेले निधीचे सुधारित वाटप व वितरित केलेले अन्नधान्य सोबतच्या अनुक्रमे परिशिष्ट- २ व ३ मध्ये दर्शविलेले आहे. केंद्र शासनाच्या सदरहू सूचना व आदेशांची तात्काळ अंमलबजावणी सुरु करावी. तसेच सदरहू योजना सन २००१-२००२ या चालू वर्षी राज्यात तात्काळ कार्यान्वित करण्याच्या दृष्टीने संदर्भाधीन दिनांक २७-१२-२००१, १०-१-२००२, १५-१-२००२ व १६-१-२००२ च्या शासन पत्रान्वये आवश्यक ते निर्देश जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी तसेच जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांना निर्गमित केलेले आहेत. सदरहू योजना परिणामकारकरीत्या राबविण्यासाठी खालीलप्रमाणे सर्वंकष आदेश पुन्हा देण्यात येत आहेत:-

१) राज्यात संपूर्ण ग्रामीण रोजगार योजना दिनांक १ जानेवारी २००२ पासून लागू करण्यात आलेली असून तेव्हापासूनच योजनेची अंमलबजावणी सुरु राहील.

२) सन २००१-२००२ या चालू आर्थिक वर्षी आश्वासित रोजगार योजना व जवाहर ग्राम समृध्दी योजना या योजनांचे अंतर्गत दिनांक ३१ मार्च २००२ पर्यंत पूर्ण न होणारी कोणत्याही प्रकारची नवीन कामे घेऊ नयेत. सदरहू दोन्ही योजनांमधील कामे पुढच्या वर्षी प्रलंबित राहाणार नाहीत , अशा प्रकारचे नियोजन करण्याबाबतच्या सूचना संदर्भाधीन दिनांक १८-१०-२००१ च्या शासन पत्रान्वये जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी तसेच जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांना देण्यात आलेल्या आहेतच. त्याप्रमाणे कार्यवाही करावी.

३) या योजने अंतर्गत मजूरांना प्रति मनुष्य दिनी ५ किलो ग्रॅम धान्य ( गहू/तांदूळ ) मजूरीपोटी द्यावयाचे आहे.

४) संपूर्ण ग्रामीण रोजगार योजनेखालील कामावरील मजुरांना मजुरीपोटी दि. १ जानेवारी ते ३१ मार्च २००२ या काळात किती अन्नधान्य आवश्यक राहील व किती मनुष्यदिन रोजगार निर्मिती होईल याचा अंदाज बांधून तालुका निहाय आवश्यक अन्नधान्याचा तपशिल जिल्हा पुरवठा अधिका-यांना जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेचे प्रकल्प संचालक यांनी तात्काळ कळवावा व भारतीय अन्न महामंडळाकडून धान्याची उचल व योजने अंतर्गत कामावरील मजुरांना धान्याचे वाटप याबाबत दक्षतेने लक्ष घालावे.

५) संपूर्ण ग्रामीण रोजगार योजनेच्या कामासाठी आवश्यक तो निधी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेने संबंधित कार्यान्वयीन यंत्रणांना उपलब्ध करुन द्यावा.

६) वरील कामे हजेरीपटावर करावयाची आहेत. त्यानुसार हजेरीपट ठेवणे बंधनकारक राहील.

७) सन २००१-२००२ या चालु आर्थिक वर्षी आश्वासित रोजगार योजना व जवाहर ग्राम समृध्दी योजना या योजनांचे अंतर्गत दुस-या हप्त्यापोटी रोख निधी या योजनांखालील सर्वसाधारण अटी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांनी पूर्ण केल्यास व केंद्र शासनाने

मुक्त केलेल्या अन्नधान्याच्या नियतनाच्या किमान १५ टक्के अन्नधान्याची उचल केल्यासच त्यांना उपलब्ध होण्यासाठी त्या पात्र होतील, अशी केंद्र शासनाची सुधारीत मुख्य सूचना आहे. तरी सदरहू सूचनेनुसार , चालू आर्थिक वर्षी आश्वासित रोजगार योजना व जवाहर ग्राम समृध्दी योजना या योजनांचे अंतर्गत दुस-या हप्त्यापोटी रोख निधी पूर्णपणे उपलब्ध होण्याच्या दृष्टीने जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी तातडीने कार्यवाही करावी.

८) शासनाच्या संदर्भाधीन दिनांक १०-१-२००२ च्या पत्रान्वये निर्गमित सूचनानुसार , सर्व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांनी फोटोझिंको मुद्रणालय, येरवडा,पुणे येथून धान्य कुपने तातडीने प्राप्त करुन घ्यावीत व त्याप्रमाणे शासनास अवगत करावे. तसेच, छापून घेतलेली कूपने संपण्यापूर्वी आवश्यक कूपनांची छपाई योग्य वेळी शासकीय मुद्रणालयाकडून करुन घ्यावी.

९) सन २००१-२००२ या चालू आर्थिक वर्षी आश्वासित रोजगार योजना व जवाहर ग्राम समृध्दी योजना या योजनाच्या कामावरील मजुरांनी हजेरीपटावर जेवढे दिवस काम केले असेल , त्या दिवसांची नोंद धान्य कुपनांवर करुन, मजुरांना अन्नधान्य द्यावयाचे आहे. त्यानुसार देय असलेल्या धान्याच्या परिमाणाची कुपने दर आठवडयांनी कामांची अंमलबजावणी करणाऱ्या यंत्रणेने सही व शिक्क्यांनिशी मजुरांना देण्यात यावी. ही धान्य कुपने मजुरांनी रास्त धान्य दुकानदाराकडे सादर केल्यावर कुपनांवर नमूद केलेल्या परिमाणा एवढे धान्य मजुरांना दुकानदाराने उपलब्ध करुन द्यावयाचे आहे. तत्पूर्वी संपूर्ण ग्रामीण रोजगार योजनेखालील कामांवरील मजुरांना कामाची अंमलबजावणी करणा-या यंत्रणेने मजुरी प्रदान करताना एकूण मजुरीतून धान्याची किंमत कमी करुन, उर्वरीत मजुरी मजुरांना रोखीने द्यावयाची आहे. अशारीतीने अन्नधान्याची किंमत एकूण मजुरीतून अंमलबजावणी करणा-या यंत्रणेने कापून घेतलेली असल्यामुळे मजुरांकडून दुकानदारांने धान्याची किंमत घ्यावयाची नाही.

१०) सन २००१-२००२ या चालू आर्थिक वर्षी संपूर्ण ग्रामीण रोजगार योजनेचा एक भाग म्हणून राबविण्यात येणा-या आश्वासित रोजगार योजना व जवाहर ग्राम समृध्दी योजना या योजनांचे अंतर्गत अन्नधान्याचे नियतन , उचल, वितरण याबाबत मासिक प्रगती अहवाल केंद्र शासनाने विहित केलेल्या प्रपत्रात जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेचे प्रकल्प संचालक यांनी केंद्र शासनास तसेच अतिरिक्त संचालक, प्रकल्प आखणी व एकात्मिक ग्रामीण विकास कक्ष, कुटीर क्रमांक १४ , मुंबई तसेच, संचालक, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, कुटीर क्रमांक ५ व ७ , फ्री प्रेस जनरल मार्ग, मुंबई, यांना दरमहा पाठवावेत. प्रपत्राचा नमुना सोबतच्या परिशिष्ट - ४ मध्ये दिलेला आहे.

११) या योजने अंतर्गत मजुरांना अन्नधान्य वाटपासाठी गव्हाकरीता प्रति किलोग्राम रु. ५.०० व तांदूळाकरीता प्रति किलोग्रॅम रु. ६.०० हे दारिद्रय रेषेखालील दर ( बीपीएल ) आकारण्यात यावेत.

१२) या योजने अंतर्गत कुपने व हजेरी पटाच्या छपाईचा खर्च राज्य शासनाच्या हिश्श्यातून भागविण्यात यावा.

३.  सन २००२-२००३ या पुढील आर्थिक वर्षापासून पूर्ण एकात्मिक स्वरुपाची संपूर्ण ग्रामीण रोजगार योजना अंमलात आणावयाची असून , त्या अनुषंगाने केंद्र शासनाच्या मुख्य सूचना सोबतच्या परिशिष्ट- ५ मध्ये दिलेल्या आहेत. केंद्र शासनाच्या सदरहू सूचनांची अंमलबजावणी करावी. या योजनेची ठळक वैशिष्टये खालीलप्रमाणे आहेत :-

१) मजूरांना प्रति मनुष्य दिन ५ किलो ग्रॅम इतके अन्नधान्य ( गहू व तांदूळ ) मजूरीचा भाग म्हणून द्यावयाचे आहे.

२) या योजने अंतर्गत उपलब्ध निधीपैकी ५० टक्के निधी पहिला स्त्रोत म्हणून जिल्हा व पंचायत स्तरासाठी असणार आहे.

३) या योजने अंतर्गत उर्वरित ५० टक्के निधी दुसरा स्त्रोत म्हणून ग्राम पंचायत स्तरावर राखीव ठेवला जाणार आहे.

४) संपूर्ण ग्रामीण रोजगार योजनेच्या पहिल्या स्त्रोतातील २२.५ टक्के निधी दारिद्रय रेषेखालच्या अनुसूचित जाती / जमातीच्या कुटुंबाच्या शेतीवर व त्यांना आर्थिक व सामाजिक सुविधा उपलब्ध करण्यासाठी वैयक्तिक लाभाकरिता खर्च करावयाचा आहे.

५) या योजनेच्या दुस-या स्त्रोतातील ५० टक्के निधी अनुसूचित जाती / जमातीच्या वस्त्यांमध्ये मुलभूत सोयींचा विकास करण्यासाठी खर्च करावयाचा आहे.

संपूर्ण ग्रामीण रोजगार योजना राज्यात परिणामकारकरीत्या कार्यान्वित करण्याच्या दृष्टीने शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे. :-

१). राज्यामध्ये रोजगार हमी योजना, संपूर्ण ग्रामीण रोजगार योजना (पहिला स्त्रोत/दुसरा स्त्रोत), अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम, पाणलोट विकास कार्यक्रम इ. विविध योजनांचा ग्राम पातळीवर समन्वय साधणे, एक स्त्रोत एक योजना प्रमाणे दुरुक्ती टाळणे, याकरिता जिल्हा पातळीवर एका समन्वय समितीची व सुकाणू समितीची आवश्यकता आहे. शिवाय जिल्हा पातळीवर संपूर्ण ग्रामीण रोजगार योजना, रोजगार हमी कार्यक्रम, केंद्र शासनाचा अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम, एकात्मिक पडिक जमीन विकास योजना, तसेच बहिस्थ संस्थांकडून घेण्यात येणारे पाणलोट विकास कार्यक्रम यासंबंधी खालीलप्रमाणे जिल्हा रोजगार समन्वय व सुकाणू समिती स्थापन करण्यात येत आहे. जिल्हाधिकारी यांच्या उपस्थितीत जिल्हा ग्रामीण रोजगार समन्वय व सुकाणू समितीची बैठक आयोजित करण्यात यावी. या समितीच्या बैठका महिन्यातून एकदा उपजिल्हाधिकारी (रोजगार हमी योजना) हे आयोजित करतील व त्या संबंधीची बैठकीची विषयसूची, इतिवृत्तेसुध्दा तेच तयार करतील :

<u>जिल्हा ग्रामीण रोजगार समन्वय व सुकाणू समिती :</u>

| | | |
|---|---|---|
| १) | जिल्हाधिकारी | : अध्यक्ष |
| २) | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | : सह अध्यक्ष |
| ३) | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा | : सदस्य |
| ४) | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | : सदस्य |
| ५) | उप जिल्हाधिकारी (पुरवठा) | : सदस्य |
| ६) | उप जिल्हाधिकारी (रोजगार हमी योजना) | : सदस्य-सचिव |

**जिल्हा ग्रामीण रोजगार समन्वय व सुकाणू समितीची कार्यकक्षा :**

ही समिती प्रामुख्याने ग्रामीण रोजगार व पाणलोट विकासाच्या योजनांची समन्वय समिती म्हणून कार्य करेल. रोजगार हमी कायद्याप्रमाणे जिल्हा स्तरावर मंजूर झालेली रोजगार हमीची निलप्रत या आराखडयाचा भाग राहील. याशिवाय, संपूर्ण ग्रामीण रोजगार योजना, अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम, एकात्मिक पडिक जमीन विकास कार्यक्रम व राज्य स्तरावरील जलसंधारण कार्यक्रम यांचा आराखडा मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी या समितीला पाठवावयाचा आहे.

**जलसंधारण/पाणलोट कार्यक्रम - नियोजन संनियंत्रण व आढावा.**

पाणलोट विकास प्रकल्प/जलसंधारण कार्यक्रमाचे नियोजन करताना एका कार्यक्रमाखाली एक कार्यक्रम/एक प्रकल्प अथवा काम या तत्वावर कार्यक्रम आखण्यात यावा. याशिवाय, बहिस्थ संस्था सहाय्यित अंतर्भूत गांवे, इंडो-जर्मन प्रकल्पामधील गांवे, नाबार्ड प्रकल्पामधील गांवे व आदर्श गांव योजनेमधील गांवे यांचे पाणलोट किंवा जलसंधारणाचे नियोजन अभिप्रेत नसले तरीसुध्दा अशा प्रकल्पांची नांवे समितीने अवगत करुन घ्यावी, म्हणजे कार्यक्रमाची पुनरावृत्ती टळून आर्थिक अनियमितता तथा गैरप्रकार टाळता येतील. याशिवाय, रोजगार हमी योजनेखाली टंचाई निवारणाचा भाग म्हणून मोठया प्रमाणात पाणवहाळाची एकेरी पध्दतीने कामे घेतली जातात . यापूर्वी झालेल्या सर्व कामांची गांववार यादी कृषि आयुक्तालयाच्या जिल्हा स्तरीय यंत्रणेकडून मागवून यातील सर्व कामे प्रकल्प तयार करताना वगळावी लागतील.

केंद्र शासनाच्या संपूर्ण ग्रामीण रोजगार योजनेच्या दोन स्त्रोतांपैकी जिल्हा परिषद व पंचायत समितीकडे जाणारा स्त्रोत पाणलोट विकास/जलसंधारण कार्यक्रमासाठी वापरण्यात यावा, असा राज्य शासनाने निर्णय घेतलेला आहे. यामध्ये जिल्हा परिषद सदस्य, पंचायत समिती सदस्य यांनी जलसंधारण विभागाने शासन , निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक : जलसं-१०९५/प्रक्र. २५०/जल-७, दिनांक ३० जानेवारी, १९९६ अन्वये प्रसुत केलेल्या मार्गदर्शक तत्वांप्रमाणे पाणलोट विकासासाठी गांवे निवडावीत व त्यांचा आराखडयामध्ये समावेश करावा. या वर्षी यासाठी जिल्हाधिकाऱ्यांनी रोजगार हमी योजनेंतर्गत निवडलेल्या गावांमध्ये अथवा जलसंधारण विभागाने निवडलेल्या गावांमध्ये अपूर्ण पाणलोट विकासाचा कार्यक्रम राबविण्यात यावा. पहिल्या वर्षासाठी नवीन गांवे फेब्रुवारी अखेरपर्यंत निवडावीत. या गावातील जलसंधारण व पाणलोटाची सर्व कामे (पाझर तलाव, गावतळी) २ वर्षाच्या कालावधीत पूर्ण करण्यात यावीत. थोडक्यात, दोन वर्षात नवीन गांवे निवडण्यात येणार नाहीत. ही गांवे निवडण्याचे पूर्ण अधिकार त्या त्या क्षेत्रातील जिल्हा परिषद व पंचायत समिती सदस्यांना राहतील. त्यांनी जास्तीत जास्त जिल्हा परिषद व पंचायत समिती मतदार संघातून एक गांव २ वर्षासाठी , निवडीसाठी वरीलप्रमाणे निकषांचे अधिन राहून निवडावे. हा कार्यक्रम केंद्र शासनाच्या लोकसहभाग संकल्पनेमधून राबवावयाचा असून , केंद्र शासनाच्या अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रमाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार करण्यात येईल.

तालुक्यात कमीत कमी चार उत्कृष्ट पाणलोट तयार करणे, हाही या कार्यक्रमाचाच भाग राहील. पूर्वी टंचाई कालावधीत रोजगार हमी योजने खाली जलसंवर्धनासाठी घेतलेल्या गावातील पूर्ण पाणलोट प्रकल्प तयार करावे. अपूर्ण कामे त्याच स्त्रोताखाली त्याच यंत्रणेने पुर्ण करावीत, म्हणजे हिशेब ठेवण्यास सुकर होईल.

राज्यातील **'सुदूर संवेदन तंत्रज्ञान संस्थेने'** निर्माण केलेल्या सुविधा तथा नकाशे यांचा योग्य वापर या नियोजनात व्हावा, अशी शासनाची अपेक्षा आहे. राज्यातील बहुतेक सर्व जिल्हयांना सुदुर संवेदन तंत्रज्ञानाचा आधार जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी यांना देण्यात आलेला आहे.

राज्य शासनाच्या निधी अंतर्गतसुध्दा 'जलसंधारण तथा पाणलोट विकास संकल्पना यापुढे लोकसहभागाच्या आधारावरच राबविली जाईल. त्यामुळे ज्या गावामध्ये हा कार्यक्रम घेण्याचे प्रस्तावित केले आहे, त्या गावामध्ये जलसंधारण तथा पाणलोट समिती स्थापन करण्यात यावी. या पाणलोट समितीमध्ये ग्राम सभेने नामनिर्देश केलेले काही प्रतिनिधी असावेत. सबंधित कार्यकारी यंत्रणेच्या प्रतिनिधीने ३ महिन्यातून ग्राम सभेला या कार्यक्रमा संबंधी माहिती द्यावी . गावांमध्ये याबद्दलच्या कामांच्या प्रकल्पांची मांडणी, त्याची किंमत जाहीर ठिकाणी लावणे बंधनकारक राहील. 'लोकांना माहितीचा अधिकार' या संकल्पनेचा हा एक भाग आहे. त्यामुळे पारदर्शकता व लोकांबरोबर काम, हे नवीन तत्व या कार्यक्रमात जाणीवपूर्वक अग्रस्थानी राहील, याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी तथा कार्यक्रम राबविणा-या यंत्रणेने अथवा स्वयंसेवी संस्थेने स्विकारणे आवश्यक आहे.

राज्यातील पाणलोट विकास कार्यक्रमाखाली भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेच्या सर्व पाणलोटांना क्रमांक देण्यात आलेले आहेत. त्या क्रमानेच या भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेच्या पाणलोट प्रकल्पात असणा-या सूक्ष्म पाणलोटांना क्रमांक देण्यात यावेत व कोणता पाणलोट कोणत्या कार्यक्रमाखाली दिला आहे, याची संपूर्ण माहिती तयार करण्यात यावी व हे काम पूर्णत कृषि आयुक्तांच्या यंत्रणेचे राहील.

वरील सर्व पाणलोट विकासाचे नियोजन जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी तयार करावयाचे आहे. या नियोजनासाठी जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी , प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, उप जिल्हाधिकारी (रोहयो), कार्यकारी अभियंता ( लघु पाटबंधारे - राज्य स्तर व स्थानिक स्तर), कार्यकारी अभियंता ( लघु पाटबंधारे - जिल्हा परिषद), कार्यकारी अभियंता (सार्वजनिक बांधकाम), कार्यकारी अभियंता ( सार्वजनिक बांधकाम - जिल्हा परिषद), उप संचालक, (सामाजिक वनीकरण ) , जिल्हा वन अधिकारी, वरिष्ठ भूवैज्ञानिक, जिल्हा भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, जिल्हा पुरवठा अधिकारी या सर्वांच्या चमुने सदर काम पूर्ण करावयाचे आहे. या कामामध्ये प्रामुख्याने बैठका आयोजित करणे, आराखडे तयार करणे आणि सनियंत्रण करणे, इत्यादि कामे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी अथवा कृषि आयुक्तांचे जिल्हा प्रतिनिधी हे करतील.

जलसंधारण तथा पाणलोट विकास कार्यक्रमाखाली प्रकल्प आराखडा तयार करणे बंधनकारक आहे. यासाठी कंटूर सर्व्हे, जल अंदाजपत्रक, एल सेक्शनचा वापर या सर्व तांत्रिक बाबी बंधनकारक राहतील. कोणत्याही परिस्थितील सिमेंट बांधकामे पहिल्या टप्प्यात घेण्यात येऊ नयेत. 'माथा ते पायथा' हे तत्व नियोजनानुसार प्रत्यक्ष अंमलात आणले पाहिजे. या तंत्रज्ञानाने योग्य विकास होऊ शकतो, हे राज्यातील यशस्वी प्रकल्पांनी सिध्द केलेले आहे.

संपूर्ण ग्रामीण रोजगार योजनेतील पहिल्या स्त्रोतामध्ये २२.५ टक्के निधीमधून प्रामुख्याने अनुसूचित जाती/जमाती इत्यादि शेतक-यांच्या शेतात बांधबंदिस्ती, शेततळे, जलकुंभ, जमीन सपाटीकरण, बोडी, जलसिंचन विहिरी, फलोद्यान अथवा वृक्ष लागवड इत्यादि कामे घेता येतील की ज्यामुळे जलसंधारण होवून भूगर्भातील पाण्याची पातळी वाढेल.

संपूर्ण ग्रामीण रोजगार योजनेतील दुस-या स्त्रोतातील ५० टक्के निधी अनुसूचित जाती/ अनुसूचित जमातीच्या वस्तींच्या सुधारणेसाठी खर्च करावयाचा असून त्यामध्ये पिण्याच्या पाण्याची टाकी, तलाव ही कामे प्राधान्याने घेण्यात यावीत.

२). **रस्ते नियोजन :**

जिल्हयात मोठया प्रमाणात ग्रामीण रस्त्यांचे नियोजन व अंमलबजावणी करण्यात येते. नवीन संपूर्ण ग्रामीण रोजगार योजना, रोजगार हमी योजना, पंतप्रधान ग्राम सडक योजना, नाबार्ड या

संस्थांच्या कार्यक्रमांतर्गत रस्ते प्रस्तावित करण्यात येतात. या सर्व कार्यक्रमाखालील रस्त्यांचा समन्वय करण्याची गरज आहे. अन्यथा दुरुक्ती, अनियमितता होण्याची शक्यता नाकारता येत नाही. शासनाच्या असे निदर्शनास आलेले आहे की, काही गावांमध्ये वाजवीपेक्षा जास्त रस्ते तयार करण्यात आलेले आहेत. याचा संपूर्ण समन्वय कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (राज्य स्तर) यांच्याकडून करण्यात यावा, असे शासन सूचित करीत आहे.

३) **<u>सामाजिक वनीकरण</u>** :

राज्यातील पडिक जमीन ( खाजगी व शासकीय ) विकसित करण्यासाठी योजना घेण्यात याव्यात. यामध्ये वृक्ष लागवड तसेच सम पातळी चर ( वृक्ष लागवडीसह ) यांचा अंतर्भाव असावा.

४) **<u>संपूर्ण ग्रामीण रोजगार योजनेची कार्यप्रणाली</u> :**

**<u>अंमलबजावणी करणारी यंत्रणा</u>** :

संपूर्ण ग्रामीण रोजगार योजनेखालील सर्व प्रकारची कामे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, कार्यकारी अभियंता (लघु पाटबंधारे, राज्य स्तर व स्थानिक स्तर), कार्यकारी अभियंता (सार्वजनिक बांधकाम विभाग), उप संचालक (सामाजिक वनीकरण), जिल्हा वन अधिकारी, कार्यकारी अभियंता (जिल्हा परिषद-सार्वजनिक बांधकाम विभाग), कार्यकारी अभियंता (जिल्हा परिषद-लघु पाटबंधारे) यांच्या मार्फत करण्यात यावीत. वरील सर्व यंत्रणांवर संपूर्ण ग्रामीण रोजगार योजनेची कामे करणे बंधनकारक राहील. ज्या यंत्रणा या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीमध्ये सहकार्य देणार नाहीत, त्या यंत्रणांवर रोजगार हमी कायद्याप्रमाणे शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल, हे स्पष्ट करण्यात येत आहे.

**<u>राज्य शासन या कार्यक्रमास अत्युच्च प्राधान्य देत असून रोजगार व अन्न सुरक्षितता प्रामुख्याने आदिवासी भागातील विकास (कुपोषण प्रतिबंधक योजना) व दारिद्र्य रेषेखालील कुटुंबांचा विकास या संकल्पना जिल्हा स्तरावरील नियोजनाचा प्रमुख उद्देश असेल, हे स्पष्ट करण्यात येत आहे.</u>**

५) **<u>धान्य वाटप व्यवस्थापन</u> :**

संपूर्ण ग्रामीण रोजगार योजने अंतर्गत (दोन्ही स्त्रोत) धान्य वाटप अनिवार्य व बंधनकारक आहे. तसेच हजेरीपट ठेवणे व मजुरांना धान्य कुपने देणे, हा कामाचा एक अविभाज्य भाग आहे. धान्य वाटप न झाल्यास , त्या जिल्हाचा तथा ग्राम पंचायतीचा त्याप्रमाणात निधीचा वाटा कमी होणार आहे, हे लक्षात घेऊन राज्यामध्ये जास्तीत जास्त कामे होणे व जास्तीत जास्त धान्य वाटप होणे याकडे जिल्हा प्रशासनाने लक्ष दिले पाहिजे. यासाठी जिल्हा पुरवठा अधिकारी व समन्वय यंत्रणेने एकत्रित धान्य वाटपाचे (logistic) नकाशे तयार करावे. ज्या ठिकाणी धान्य वाटपासाठी स्वस्त धान्य (रेशन) दुकान नसेल अथवा बंद असेल, तर सदर दुकान ज्या लगतच्या गावातील रास्त भाव दुकानास जोडले असेल तेथून धान्य वाटप होईल, हे पहावे. प्रामुख्याने आदिवासी क्षेत्रात धान्य वाटप व्यवस्थित व वेळेवर होईल याकडे लक्ष देणे हे काम समन्वय समितीकडे राहील. या कार्यक्रमाखाली धान्य दारिद्र्य रेषेखालील घाऊक दराने (गहू प्रति किलो ग्रॅम रु. ५.०० व तांदूळ प्रति किलो ग्रॅम रु.६.००) मजूराला मजूरीचा भाग म्हणून देण्यात यावे. कामावर येणा-या पैकी एका सुशिक्षित मजूरा मार्फत हजेरीपट ठेवावे व त्याला प्रति दिनी रु.५/- जास्त मजूरी देण्यात यावी. संपूर्ण ग्रामीण रोजगार योजनेच्या पहिल्या व दूस-या या दोन्ही स्त्रोतातील कामावरील मजूरांना धान्य वाटप बंधनकारक आहे. त्याकरिता जिल्हा परिषद/पंचायत समिती यांनी पहिल्या स्त्रोतातील कामासाठी

तसेच दूस-या स्त्रोतातील कामासाठी देखिल हजेरीपट ठेवणे अनिवार्य असून त्याप्रमाणे धान्य वाटप करावे व त्या संदर्भातील आवश्यक ते प्रशिक्षण संबंधितांना देण्याची कार्यवाही त्यांनी करावी. संपूर्ण ग्रामीण रोजगार योजने अंतर्गत कुपने व हजेरीपटाच्या छपाईचा खर्च राज्य शासनाच्या हिश्श्यातून भागविण्यात यावा.

या योजने अंतर्गत कामावरील मजूरांनी हजेरीपटावर जेवढे दिवस काम केले असेल त्या दिवसांची नोंद धान्य कूपनांवर करुन, मजूरांना अन्नधान्य द्यावयाचे आहे. त्यानुसार, देय असलेल्या धान्याच्या परिमाणाची नोंद कूपनांवर करुन, ही कूपने दर आठवडयांनी कामाची अंमलबजावणी करणा-या यंत्रणेने सही व शिक्क्यानिशी मजूरांना देण्यात यावीत. ही धान्य कूपने मजूरांनी रास्त धान्य दुकानदाराकडे सादर केल्यावर कूपनांवर नमूद केलेल्या परिमाणा एवढे धान्य मजूरांना दुकानदाराने द्यावयाचे आहे. तत्पूर्वी संपूर्ण ग्रामीण रोजगार योजनेखालील कामावरील मजूरांना कामाची अंमलबजावणी करणा-या यंत्रणेने मजूरी प्रदान करतांना एकूण मजूरीतून वर नमूद केलेल्या दराने धान्याची किंमत कमी करुन, उर्वरित मजूरी मजूरांना रोखीने द्यावयाची आहे. अशारितीने अन्नधान्याची किंमत एकूण मजूरीतून अंमलबजावणी करणा-या यंत्रणेने कापून घेतलेली असल्यामुळे, मजूरांकडून दुकानदाराने धान्याची किंमत घ्यावयाची नाही.

या योजने अंतर्गत अन्नधान्याचे नियतन, उचल, वितरण याबाबतचा मासिक प्रगती अहवाल केंद्र शासनाने विहित केलेल्या प्रपत्रात जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेचे प्रकल्प संचालक यांनी केंद्र शासनास तसेच अतिरिक्त संचालक, प्रकल्प आखणी व एकात्मिक ग्रामीण विकास कक्ष, कुटीर क्र. १४, मुंबई तसेच, संचालक, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, कुटीर क्रमांक ५, मुंबई, यांना दरमहा पाठवावेत. प्रपत्राचा नमुना सोबतच्या परिशिष्ट -६ मध्ये दिलेला आहे.

६) **कामाची तपासणी व दक्षता प्रणाली :**

केंद्र शासनाच्या जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणे मार्फत राबविण्यात येत असलेल्या संपूर्ण ग्रामीण रोजगार योजना, अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम व एकात्मिक पडिक जमीन विकास कार्यक्रम या योजना रोजगाराभिमुख व क्षेत्रिय विकासाच्या योजना आहेत. या कामांवर वेळेवर व योग्य मजूरी वाटप, धान्य वाटप यांवर संनियंत्रण व दक्षता ठेवण्याची गरज आहे. यासाठी रोजगार हमीप्रमाणे तपासणी व दक्षता प्रणाली अंमलात आणण्याचे शासनाने ठरविले आहे.

मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद), उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्राम पंचायत), प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, गट विकास अधिकारी यांना खालीलप्रमाणे तपासणीचे उद्दिष्ट देण्यात येत आहे. तपासणीसाठी रोजगार हमी योजनेखालील प्रशासकीय तपासणी नमुना वापरण्यात यावा.:-

| | **प्रति महिना/वेळा** |
|---|---|
| मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | ३ |
| उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्राम पंचायत) | ४ |
| प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा | ६ |
| गट विकास अधिकारी, पंचायत समिती | ६ |

७) तांत्रिक तपासणी जिल्हा स्तरावरील अधिका-यांनी करणे सक्तीचे व अनिवार्य आहे. वरील तांत्रिक तपासणीसाठी रोजगार हमी योजने खालील तांत्रिक तपासणी नमुना वापरण्यात यावा. तांत्रिक तपासणीचे उद्दिष्ट खालीलप्रमाणे देण्यात येत आहे :-

| | **प्रति महिना / वेळा** |
|---|---|
| जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी तथा जिल्हा कृषि अधिकारी | ४ |
| कार्यकारी अभियंता (लघु पाटबंधारे) | ४ |
| कार्यकारी अभियंता (सार्वजनिक बांधकाम) | ४ |
| उप संचालक (सामाजिक वनीकरण) | ४ |
| कार्यकारी अभियंता (जिल्हा परिषद-साबांवि) | ४ |
| कार्यकारी अभियंता (जिल्हा परिषद-लघु पाटबंधारे) | ४ |

या कार्यक्रमा अंतर्गत मजूरांची उपस्थिती, धान्य वाटप या संबंधी दर पंधरवडयाला शासनाला अहवाल देणे अगत्याचे राहील. यासाठी कामाचा प्रकार, धान्य वाटप, मजूरी वाटप या संबंधीचे नियतकालिक अहवाल राज्य शासनास/केंद्र शासनास दर पंधरवडयास पाठविण्याची जबाबदारी प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांची राहील.

७). **विभागीय स्तरावरील संनियंत्रण, देखरेख व पर्यवेक्षण** :-

विभागीय स्तरावर विभागीय आयुक्त या कार्यक्रमाची देखरेख, पर्यवेक्षण व संनियंत्रण करतील. सर्व विभागीय स्तरावरील तसेच जिल्हा स्तरावरील अंमलबजावणी करणा-या यंत्रणा विभागीय आयुक्तांना या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी जबाबदार राहतील. विभागीय आयुक्त याबाबत रोजगार हमी योजने प्रमाणेच संबंधित विभागाच्या अधिका-यांवर शिस्तभंगाची कारवाई करण्यास सक्षम असतील. उप आयुक्त (विकास) हे या कार्यक्रमाच्या नियतकालिक (पाक्षिक तसेच मासिक) मजूर उपस्थिती, धान्य वाटप, कामांची प्रगती, तपासणी इत्यादीबाबत संनियंत्रणासाठी जबाबदार राहतील.

संपूर्ण ग्रामीण रोजगार योजनेच्या कार्यक्रमांचा पंचायत समिती आणि जिल्हा परिषद स्तरावर अनुक्रमे पंचायत समितीने आणि जिल्हा परिषदेने कृति आराखडा मंजूर करावा. संपूर्ण ग्रामीण रोजगार योजनेच्या कार्यक्रमाचा जिल्हा व पंचायत समिती अंतर्गत पहिल्या स्त्रोताचा आराखडा जिल्हा परिषदेने ठराविक कालावधीत मंजूर न केल्यास मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना हा आराखडा मंजूर करण्याचे अधिकार राहतील. या कार्यक्रमाखाली केंद्र शासन व राज्य शासनाचा सर्व निधी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेने राष्ट्रीयकृत बँकेच्या/पोष्टाच्या स्वतंत्र बचत खात्यामध्ये ठेवावा. त्यांनी रोजगार हमी योजनेप्रमाणे वार्षिक आराखडा मंजूर झाल्यानंतर व कामाचे कार्यादेश (वर्क ऑर्डर) झाल्यानंतर कामाच्या प्रगतीनुसार पतमर्यादा वितरीत करावी. कोणत्याही परिस्थितीत कोणत्याही यंत्रणेला आगाऊ रक्कम या कार्यक्रमाखाली देता येणार नाही. तसेच धान्य पुरवठा व रोख रक्कम यांचा एकत्रित हिशेब संबंधित कार्यान्वयीन यंत्रणांनी देणे बंधनकारक राहील.

८) **प्रसिध्दी :**

या कार्यक्रमाला जिल्हयातील दैनिक वर्तमानपत्र, आकाशवाणी, दूरदर्शन या प्रसार माध्यमातून जास्तीत जास्त प्रसिध्दी दयावी. याशिवाय या कार्यक्रमातून मंजूर होणारी कामे ही दर आठवडयाला वर्तमानपत्रात प्रसिध्द करण्यांत यावीत. या कार्यक्रमाखाली मिळणा-या सोयी व सवलती याबद्दल प्रसिध्दी देण्यात यावी. याशिवाय, प्रत्येक ग्राम पंचायत, पंचायत समिती व जिल्हा परिषद

